ग्रामीण स्वयंरोजगार प्रशिक्षण संस्था (RSETI - Rural Self Employment Training Institutes) या केंद्र पुरस्कृत योजनेकरीता केंद्र शासनाचा हिस्सा वितरीत करण्यासाठी नवीन लेखाशिर्ष उघडणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**

शासन निर्णय क्रमांकः उमेद - २०२१/प्र.क्र.६९/योजना-३
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ०६ ऑक्टोबर, २०२१

**प्रस्तावना :-**

ग्रामीण स्वयंरोजगार प्रशिक्षण संस्था (RSETI - Rural Self Employment Training Institutes) या योजनेची अंमलबजावणी सन २०१२-१३ पासून महाराष्ट्र राज्यात ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत होत असून सदर योजना ही १००% केंद्र पुरस्कृत आहे. सदर योजनेसाठी केंद्र शासनामार्फत १००% निधी उपलब्ध करुन दिला जातो. RSETI या योजनेंतर्गत ग्रामीण भागातील दारिद्र्य रेषेखालील १८ ते ४५ वयोगटातील युवक युवतींना स्वयंरोजगारासाठी १० ते ४५ दिवसांचे विविध व्यवसायांचे (शेती व बिगर शेती) निवासी व विनामुल्य / मोफत प्रशिक्षण दिले जाते. ही प्रशिक्षण केंद्रे चालविण्याची संपूर्ण जबाबदारी त्या त्या जिल्हयातील Lead बँकेकडे केंद्र शासनामार्फत सोपविण्यात आलेली आहे. महाराष्ट्र राज्यात एकूण ३५ RSETIS आहेत. प्रत्येक प्रशिक्षण केंद्रात दरवर्षी किमान ७५० प्रशिक्षणार्थींना प्रशिक्षण देण्यासाठी केंद्र शासनामार्फत निर्गमित केलल्या Common Cost Norms Notification नुसार प्रतिपूर्ती (Reimbursement) स्वरुपात अनुदान वितरीत केले जाते. सदर योजनेसाठी सन २०१९-२० पर्यंत केंद्र शासनामार्फत प्राप्त होणारा निधी हा थेट महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानाच्या बँक खाती प्राप्त होत असल्यामुळे केंद्र हिस्सा यासाठी लेखाशिर्ष उघडण्यात आलेले नव्हते. तथापि, माहे मार्च, २०२१ पासून केंद्र शासनाकडून प्राप्त होणारा निधी हा राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा होत असल्यामुळे सदर केंद्र हिस्सा वितरीत करण्यासाठी नवीन स्वतंत्र लेखाशिर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

ग्रामीण स्वयंरोजगार प्रशिक्षण संस्था (RSETI - Rural Self Employment Training Institutes) या योजनेसाठी प्राप्त होणारा केंद्र हिस्सा वितरीत करण्यासाठी खालील प्रमाणे नवीन स्वतंत्र लेखाशिर्ष उघडण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| लेखाशिर्ष मराठी | लेखाशिर्ष इंग्रजी |
|---|---|
| मागणी क्र.एल ३,<br>२५०१, ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम,<br>०६, स्वयंरोजगार कार्यक्रम,<br>१०१, सुवर्ण जयंती ग्राम स्वयंरोजगार योजना, (०१) सुवर्ण जयंती ग्राम स्वयंरोजगार योजना,<br>(०१)(१८) महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत ग्रामीण स्वयंरोजगार प्रशिक्षण संस्थांना वित्तीय सहाय्य (केंद्र हिस्सा १०० टक्के) (कार्यक्रम), ३३ अर्थसहाय्य, (२५०१ ए१४६) | Demand No.L-3,<br>2501, Special Programmes for Rural Development, 06, Self Employment Programmes, 101, Suvarna Jayanti Gram Swayamrojgar Scheme, (01) Suvarna Jayanti Gram Swayamrojgar Scheme, (01)(18) Financial Assistance to Rural Self Employment Training Institutes Under Maharashtra State Rural Livelihood Mission (Central Share 100 %) (Scheme), 33 Subsidies, (2501 A146) |

२. सदर शासन निर्णय मा.प्रधान महालेखाकार (लेखा व हकदारी)-I, महाराष्ट्र, मुंबई यांच्या मान्यतेने अनौपचारिक संदर्भ क्र.ख.वि./चा-१/ग्रा.वि.वि.ज.सं.वि./यू.ओ.आर.-५१/२०२१-२२/१८९, दिनांक २०.०७.२०२१ तसेच नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.६३/का.१४४४, दिनांक ०१.०९.२०२१ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३६३/२०२१/व्यय-१५, दिनांक १४.०९.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११००६१२१७५३१८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: cn=Dilip Babasaheb Patil, o=Rural Development Department, ou, email=dilip.patil@nic.in, c=US
Date: 2021.10.06 14:37:10 +05'30'

( दि. बा. पाटील )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा.मंत्री, ग्राम विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) मा.राज्यमंत्री, ग्राम विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद यांचे स्वीय सहायक, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
५) महालेखापाल (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
६) विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
७) जिल्हाधिकारी (सर्व)
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
९) उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)
११) उप सचिव, वित्त विभाग (व्यय-१५) व ( अर्थ-१७) मंत्रालय, मुंबई-३२.
१२) उप सचिव, नियोजन विभाग (का.१४४४), मंत्रालय, मुंबई-३२.
१३) संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, मुंबई.
१४) संचालक, निवासी व लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१५) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
१६) सह सचिव / उप सचिव, ग्राम विकास विभाग (सर्व कार्यासने).
१७) निवडनस्ती.